सी-डॅक, पुणे यांचेकडून करण्यात येत असलेल्या कामाचे संनियंत्रण करण्यासाठी कृती समिती गठीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय क्र.सीओएम-२०१०/सीआर-१०/संगणक कक्ष,
मंत्रालय, मुंबई – ४०० ०३२.
दिनांकः- ५ मार्च, २०१०.

**प्रस्तावनाः-**

शासकीय कामकाजात गती व पारदर्शकता आणण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागात संगणकीकरणाचा कार्यक्रम राबविण्यात आला होता. त्यास अनुसरुन सीडॅक संस्थेला संकेतस्थळावरुन वापरण्यात येणाऱ्या आज्ञावल्या विकसित करण्याचे काम सोपविण्यात आले आहे. सदर आज्ञावल्या कार्यान्वित करण्यासाठी / विकसीत करण्यासाठी मार्गदर्शनाची गरज असल्यामुळे समिती गठीत करण्याचे विचाराधिन होते.

**शासन निर्णय**

सीडॅक संस्थेमार्फत वेब बेस आज्ञावल्या पुरविण्यात येणार आहेत. सदर काम हे एका निश्चित कालावधीत पुर्ण करावयाचे असल्यामुळे त्यांना या कामी मार्गदर्शन करणे, नियंत्रण ठेवणे तसेच या कामी योग्य निर्णय घेणे व त्याबाबतचा अहवाल वेळोवेळी शासनास सादर करणेसाठी पुढीलप्रमाणे कृती समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग, मुंबई | - | अध्यक्ष |
| २. संचालक, माहिती तंत्रज्ञान व समन्वय केंद्र, पुणे | - | सदस्य |
| ३. उप सचिव (राष्ट्रीय महामार्ग), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई | - | सदस्य |
| ४. विभागीय लेखापाल, सा.बां.विभाग, पुणे. | - | सदस्य |
| ५. डॅक अभियंता, संचालक, माहिती तंत्रज्ञान व समन्वय केंद्र, पुणे | - | सदस्य |
| ६. सी-डॅकचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ७. उप कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई | - | सदस्य सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.maharashtra.gov.in) २०१००३०५१९१०१२००१ या संकेतांकान्वये उपलब्ध करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

(जे. बी. मालविय )
उप अभियंता तथा कार्यासन अधिकारी.

प्रत,
सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व मुख्य अभियंते,
उप सचिव (रा.म.), सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व अधीक्षक अभियंते,
सर्व कार्यकारी अभियंते.

\Y:\pwdde(co)\Work\Year 2010\CR-10-2010 HPSC\CR-10-2010.doc